**सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षातील प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी २२१० जी ४४९ (General) या लेखाशिर्षाखाली राज्य हिस्स्यापोटी (४०%) निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रजयो -२०२१/प्र.क्र. १३६/आरोग्य-६**
गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई
तारीख: २१ मार्च, २०२२.

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६,दि. २६ फेब्रुवारी, २०१९.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१.
३) राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई यांचे पत्र क्रमांक: राआहसो/लेखा/प्रअ/९८३८/२४०/२०२२, दि. १८.०२.२०२२.

प्रस्तावना -

आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६ फेब्रुवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना ही केंद्र पुरस्कृत योजना केंद्र व राज्य शासनाच्या सहभागातून राज्यात राबविण्यात येत असून यामध्ये केंद्र शासनाचा ६०% व राज्य शासनाचा ४०% आर्थिक सहभाग आहे. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सदर योजनेसाठी २२१० जी ४४९ (सर्वसाधारण) या लेखाशिर्षाखाली रू. १००.०० कोटी व पुरवणीद्वारे रू.११५.१४ कोटी असा एकूण रु. २१५.१४ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी दिनांक ०१ एप्रिल, २०२२ ते दिनांक ३० जून, २०२२ या कालावधीकरीता विमा हप्ता राज्य हिस्स्यापोटी रक्कम रु. ५२,६४,२१,०००/- (अक्षरी रुपये बावन्न कोटी चौसष्ट लक्ष एकवीस हजार फक्त) Escrow Account मध्ये वर्ग करण्यासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेसाठी विमा हप्ता राज्य शासनाच्या हिस्स्यापैकी (४०टक्के) रक्कम रु.५२,६४,२१,०००/- (अक्षरी रुपये बावन्न कोटी चौसष्ट लक्ष एकवीस हजार फक्त) एवढा सशर्त निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी आयुष्यमान भारत प्रधानमंत्री जन आरोग्य योजना, महाराष्ट्र या खात्यामध्ये जमा करण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीकडे वर्ग करण्यात येत आहे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दि. ०६ एप्रिल, २०२१ मधील अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा झाल्यानंतर सदर निधी योजनेच्या लाभार्थ्यांच्या विमा हप्त्यापोटी विमा कंपनीस अदा करण्यासाठी व प्रशासकीय खर्चासाठी अदा करण्यात येणार आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खालील दिलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर झालेल्या तरतुदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**

२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०१-नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा

११०- रुग्णालये व दवाखाने

०७-आयुष्यमान भारत कार्यक्रम

(०७) (०२)-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (कार्यक्रम) (राज्य हिस्सा ४० टक्के)

२२१० जी ४४९, ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)

५. सदरील खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदरील निधी हा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौ. सं. क्र. १२४/२०२२/ व्यय-१३, दिनांक ०७.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२११०३०४८९६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2022.03.21 11:35:48 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (३प्रती)
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
११. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती.